सभापणाचा सारांश मी वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध केला व लालाजींचे विचार स्पष्ट झाले असल्यामुळें त्याच्यावर कोणांहि आर्यसमाजीयानें यापुढें टीका करण्याच्या भरीस पडूं नये अशी सूचना दिली

पुढें आर्यसमाजाचे सभासद नसतानांहि ऋषि दयानंदावरील त्याची असीम श्रद्धा कायम राहिली ते नेहमीं म्हणत कीं मी गुरुडमचा विरोधी असलों तरी ऋषि दयानंदाना मी आपला गुरु मानतों ज्यावेळीं १९२५ सालीं महात्मा गांधींनीं ऋषि दयानंदावर कांहीं निराधार आक्षेप लादले त्या वेळीं त्या आक्षेपाविरुद्ध लालाजींनींसुद्धा जबरदस्त गर्जना केली, १९२७ सालीं सप्टेंबर महिन्यात दिल्ली शहरीं आर्य कॉंग्रेसचें जें भव्य अधिवेशन भरलें होतें त्या अधिवेशनातहि नगर-कीर्तनाच्या अधिकाररक्षणाच्या प्रस्तावाचें लालाजींनीं जोरदार शब्दात समर्थन केलें, आणि स्वामी श्रद्धानंदाच्या दिव्य बलिदानाच्या प्रसंगीं आर्यसमाजाचें सांत्वन करणें त्यांनीं आपलें आद्य कर्तव्य मानलें.

* * * *

१९२१ सालीं पंचविध बहिष्काराची चळवळ जोरानें चाललेली होती. सुरवातीला लालाजी शाळा कॉलेजावरील बहिष्काराविरुद्ध होते परंतु नागपूर कॉंग्रेसच्या वेळीं पंजाबी लोकमतानें त्यांना आपलें वैयक्तिक मत बाजूला ठेवण्यास भाग पाडलें नागपुराहून आल्यावर पहिल्यानें त्यांनीं डी ए. व्ही कॉलेजावरच मारा सुरू केला डी ए. व्ही. कॉलेजाकरिता लालाजींचे श्रम लाला हंसराजजींपेक्षा कोणत्याहि बाबतींत कमी नव्हते त्यांनीं आपल्या आयुष्यातील ऐन उमेदीचा अधिकांश काल कॉलेजाच्या सेवेंत घालविलेला होता. ज्या कॉलेजाकरिता त्यांनीं आपली शक्ति व धन खर्ची घातलीं होतीं तेंच कॉलेज आता ते बंद पाडण्याच्या प्रयत्नास लागले. लालाजींच्या चळवळीनें पहिल्या प्रथम डी. ए व्ही. कॉलेजात हडताळ पडला व नंतर इतर अनेक प्रमुख कॉलेजात पडला.

याच दिवसात लालाजींच्या प्रयत्नानें लाहोर शहरीं कौमी महाविद्यालयाची स्थापना झाली. याच्या मुख्य संस्थापकांत लालाजी व भाई परमानंद होते या विद्यापीठाच्या शिक्षणसमितीचा ( Board of Education ) मीहि सभासद होतों. बोर्डाच्या एका सभेत कौमी महाविद्यालयाऐवजीं राष्ट्रीय महाविद्यालय असें नांव ठेवण्यात यावें अशा अर्थाचा मी एक ठराव आणला. परंतु भाई परमानंदांनीं—जे आजकाल मुसलमानांचे कट्टे विरोधी बनले आहेत—नावांत एक तरी मुसल्मानी

शब्द असणें अवश्य आहे अशा युक्तिवादावर त्याचा विरोध केला. यावर कौमी शब्दाशीं 'मुसलमानांचा कांहीं संबंध नाहीं, तो शब्द फार्शी किंवा अरबी आहे' असें मी उत्तर दिलें. लालाजींनींसुद्धां माझ्या ठरावाला अनुमोदन दिलें; परंतु त्या कालीं बोर्डाच्या सभासदांत भाई परमानंदांचें अति प्रस्थ असल्यामुळें माझा ठराव पास होऊं शकला नाहीं.

या कौमी महाविद्यालयानें आपल्या स्नातकांना (Graduates) बी. ए. पदवी देण्याचें ठरविलें होतें. यामुळें महाविद्यालयानें स्वभाषेंत पदव्या देणें योग्य आहे असा एक ठराव मी आणला. याचेंहि लालाजींनीं समर्थन केलें. परंतु एवढ्यानेंहि हा ठराव पास होऊ शकला नाहीं. कारण बोर्डाच्या सभासदांना दास्यवृत्तीनें इतकें भारून टाकलेलें होतें कीं स्वभाषेंत पदव्या देणें त्यांचें त्यांनाच हास्यास्पद वाटत होतें.

लालाजींत असीम गुण होते व या अमोल असीम गुणांमुळेंच 'पंजाबकेसरी' ही पदवी त्यांना लाभली.



—प्रो. रामदेव, आचार्य, गुरुकुल कांगडी.

( पंजाब केसरी, लाला लजपतराय, विशेषांक, १९३० )



## लाला लजपतराय यांचें वाङ्मय.

### उर्दु.

(१) तवारिख-इ-हिंद (भा. १)
(२) महाराज शिवाजी.
(३) महाराज अशोक.
(४) मॅझिनी.
(५) गॅरिबाल्डी.
(६) स्वामी दयानंद सरस्वती.
(७) भगवान श्रीकृष्ण.

### इंग्रजी.

(1) Young India.
(2) The United States of America.
(3) England's Debt to India.
(4) Arya Samaj.
(5) Political Future of India.
(6) The Evolution of Japan.
(7) The Problem of National Education in India.
(8) Unhappy India.
(9) India's Will to Freedom.

मुद्रकः—म. ना कुलकर्णी, कर्नाटक प्रेस,
३१८ ए, ठाकुरद्वार, मुंबई.
प्रकाशक—म ना कुलकर्णी, मालक, भारत-गौरव ग्रंथमाला,
३१८ ए, ठाकुरद्वार, मुंबई.